शासकीय कार्यालयांमधील
वाहनांच्या वापरासंबंधी धोरण

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक - वाहन-१०.०५/प्र.क्र.३७/२००५/विनियम
**दिनांक :- १३ सप्टेंबर, २००५**

वाचा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- वाहन-१०.०५/प्र.क्र.१३/२००५/विनियम, दिनांक २५.५.२००५
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- वाहन-१०.०५/प्र.क्र.३७/२००५/विनियम, दिनांक ३.८.२००५

**निर्णय**

उपरोक्त दिनांक २५ मे, २००५ च्या शासन निर्णयानुसार शासकीय वाहन वापरण्यास पात्र असलेल्या अधिकाऱ्यांना त्यांचे स्वत:चे खाजगी वाहन शासकीय कामकाजाकरीता वापरण्याचे धोरण जाहीर करण्यात आले आहे व अशा अधिकाऱ्यांना सदर शासन निर्णयातील परिच्छेद - २ मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे मासिक खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरविण्यात आलेली आहे. तसेच उपरोक्त दिनांक ३.८.२००५ च्या शासन निर्णयानुसार शासकीय कामकाजासाठी स्वत:च्या खाजगी वाहनाच्या वापराचा पर्याय स्विकारणाऱ्या अधिकाऱ्यांनी सामान्य प्रशासन विभागामधील अतिरिक्त वाहन कक्षाकडे संपर्क साधून त्यासंदर्भात त्या कक्षाची अनुमती प्राप्त करुन घेणे आवश्यक आहे.

२. सदर योजनेनुसार ज्या अधिकाऱ्यांनी स्वत:च्या खाजगी वाहनाचा पर्याय स्वीकृत करण्यासाठी विकल्प सादर केला असेल, अशा अधिकाऱ्यांनी त्यांचेकडील शासकीय वाहन सामान्य प्रशासन विभागाच्या अतिरिक्त वाहन कक्षाकडे वर्ग करण्यासाठी संपर्क साधावा. असा संपर्क साधल्यानंतर वर्ग करण्यात येणाऱ्या सदर वाहनाची नोंद सामान्य प्रशासन विभागाच्या अतिरिक्त वाहन कक्षाकडील संग्रह नोंदवहीत करण्यात येईल. अशी नोंद झाल्यानंतर सदर वाहन शासकीय वाहनाची मागणी करणाऱ्या दुसऱ्या अधिकाऱ्याकडे प्रत्यक्षात सुपूर्द होईपर्यंत वाहन पूर्वीच्या वाहनधारकाच्या वापरातच /अखत्यारीत राहील. त्यानंतर सामान्य प्रशासन विभागाच्या अतिरिक्त वाहन कक्षाकडे नोंद झालेले संबधित वाहन, शासकीय वाहनासाठी मागणी करणाऱ्या इतर अधिकाऱ्यांच्या शासकीय वापरासाठी सुपूर्द करण्यात येईल. त्यामुळे ज्या दिनांकास असे शासकीय वाहन शासकीय वाहनाची मागणी करणाऱ्या दुसऱ्या अधिकाऱ्याकडे प्रत्यक्षात सुपूर्द करण्यात येईल त्या दिनांकापासून खाजगी वाहन स्वीकृत करण्याचा विकल्प सादर करणाऱ्या अधिकाऱ्यांस मासिक खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरेल. थोडक्यात खाजगी वाहनाचा विकल्प देणाऱ्या अधिकाऱ्यांचे शासकीय वाहन दुसऱ्या अधिकाऱ्याकडे प्रत्यक्षात सुपूर्द झालेल्या दिनांकापासूनच वाहन खर्चाची मासिक प्रतिपूर्ती अनुज्ञेय ठरेल. अशी प्रतिपूर्ती, विहित कार्यपध्दतीबाबत सामान्य प्रशासन विभागाकडून निर्गमित होणाऱ्या सविस्तर/स्वयंस्पष्ट आदेशानुसारच देय राहील.

३. तसेच ज्या अधिकाऱ्यांना पहिल्यांदाच शासकीय वाहन अनुज्ञेय ठरविण्यात आले आहे किंवा ज्या अधिकाऱ्यांकडील शासकीय वाहन विहित कार्यपध्दतीने निर्लेखित करण्यात आले आहे आणि त्याऐवजी दुसरे शासकीय वाहन अनुज्ञेय ठरविण्यात आले आहे, अशा अधिकाऱ्यांनी शासकीय वाहन उपलब्ध करुन घेण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या अतिरिक्त वाहन कक्षाकडे संपर्क साधणे आवश्यक राहील. अशा अधिकाऱ्यांना ज्या प्रकारचे वाहन अनुज्ञेय ठरविण्यात आले आहे तशा प्रकारचे वाहन सामान्य प्रशासन विभागाकडील अतिरिक्त वाहन कक्षाच्या संग्रहामध्ये उपलब्ध नसल्यास, सामान्य प्रशासन विभागाकडून तसे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील, त्यानंतरच अशा प्रमाणपत्राच्या आधारे संबंधित प्रशासकीय विभागाने वित्त विभागाकडे विहित कार्यपध्दतीने नवीन वाहन मंजूरीसाठी प्रस्ताव सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि.प्र.कुलकर्णी )
शासनाचे उप सचिव

प्रति,

* १. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०
* २. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०

* ३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
* ४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
५. राज्यपालांचे सचिव
६. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
७. उप मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव
८. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
९. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभागांचे अतिरिक्त मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव
१०. मंत्रालयातील सर्व प्रशासनिक विभाग
११. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१५. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकणभवन, नवी मुंबई
* १६. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* १७. प्रबंधक, उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई
* १८. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मुंबई
* १९ प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* २० सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* २१. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई
* २२ प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई ४०० ०५१
२३. उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग,कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२४. उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा,कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
२५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२६. सर्व उप कोषागार अधिकारी
२७. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
२८. सहकार व वस्त्रोद्योग विभाग( कार्यासन -हाऊसिंग सेल ,१९ -सी ),मंत्रालय, मुंबई:३२
२९. सर्व विभागीय आयुक्त
३०. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३१. सर्व जिल्हाधिकारी
३२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३३. सर्व जिल्हा परिषदांचे अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी
३४. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली ११० ००१
३५. संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८, स्टेट एम्पोरिया इमारत, बाबा खरकसिंग मार्ग, नवी दिल्ली ११०००१
३६. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३७. निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग

* पत्राद्वारे

---